**राजपत्रित अधिकारी/अराजपत्रित राज्य शासकीय व इतर कर्मचा-यांचे ऑक्टोबर, २००५ चे वेतन तसेच महाराष्ट्र राज्याच्या निवृत्तीवेतनधारक व कुटूंब निवृत्तीवेतन धारकांचे ऑक्टोबर २००५ चे निवृत्तिवेतन विहित दिनांकापूर्वी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**वित्त विभाग,**
शासन निर्णय, क्रमांक : कोषाका-१३०५/प्र.क्र.१५८/ कोषा-प्र-५
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १३ ऑक्टोबर, २००५.

वाचा : (१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक :टिआरडब्ल्यू-१३८८/प्र.क्र.१३८/८८/कोषा-४, दि. ११.७.१९८८.
(२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक :डीडीओ-१००५/प्र.क्र.५/कोषा-प्र.५, दि.२९.८.२००५

**शासन निर्णय**

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:टिआरडब्ल्यू-१३८८/प्र.क्र.१३८/८८/कोषा-४, दि. ११.७.१९८८ व शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: डीडीओ-१००५/प्र.क्र.५/कोषा-प्र.५, दि.२९.८.२००५ मधील परिच्छेद १ (८) मधील तरतूदी शिथिल करुन शासन आता असे आदेश देत आहे की, आगामी दिवाळीचा सण विचारात घेऊन ऑक्टोबर २००५ या महिन्याचे वेतन व भत्त्यांचे वितरण अनुक्रमे २५,२६ व २७ ऑक्टोबर २००५ या दिवशी करण्यात यावे.

२. शासन असेही आदेश देत आहे की, महाराष्ट्रातील सर्व उपकोषागारातून वितरित होणा-या सर्व शासकीय राजपत्रित अधिकारी/कर्मचा-यांचे ऑक्टोबर २००५ या महिन्याचे वेतन व भत्ते यांचे प्रदान मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम ७१ च्या तरतूदी शिथिल करुन दिनांक २७ ऑक्टोबर २००५ रोजी करण्यात यावे.

३. शासन आणखी असेही आदेश देत आहे की, महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ च्या खंड १ मधील नियम क्रमांक ३२८ मधील तरतूदी शिथिल करुन महाराष्ट्र राज्यातील राज्य शासकीय निवृत्तीवेतनधारकांना/ कुटूंब निवृत्तीवेतनधारकांना त्यांचे ऑक्टोबर २००५ या महिन्याचे निवृत्तीवेतन दिनांक २५ ऑक्टोबर २००५ रोजी प्रदान करण्यात यावे.

४. शासन असेही आदेश देत आहे की, मान्यताप्राप्त व अनुदानप्राप्त शैक्षणिक संस्था, कृषितर विद्यापीठे व त्यांच्या संलग्न अशासकीय महाविद्यालयांचे अधिकारी/कर्मचारी, तसेच निवत्तीवेतनधारक/कुटूंब निवृत्तीवेतन धारक यांनाही हे आदेश लागू करण्यात येत आहेत.

५. महाराष्ट्र जिल्हा परिषदांचे अधिकारी व कर्मचारी, तसेच निवृत्तीवेतनधारक व कुटूंब निवृत्तीवेतनधारक यांनाही हे आदेश लागू करण्यात येत आहेत.

कृ.मा.प...

६. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई व वांद्रे तसेच राज्यातील सर्व कोषागारे व उपकोषागारे कार्यालयांना याबाबतीत आवश्यक त्या सूचना तात्काळ निर्गमित कराव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**(क. कि. पारकर)**
शासनाच्या उप सचिव

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र,मुंबई (१० प्रती)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर, (१० प्रती)
महालेखापाल (लेखा परीक्षा )-१, महाराष्ट्र, मुंबई, (१० प्रती)
महालेखापाल (लेखा परीक्षा )-२, महाराष्ट्र, नागपूर, (१० प्रती)
महालेखापाल (वाणिज्यिक लेखापरीक्षा ), महाराष्ट्र, मुंबई, (१० प्रती)
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/वांद्रे, (१५ प्रती)
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, (१० प्रती)
मंत्रालयाच्या सर्व विभागांच्या अधिपत्या खालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय ( मुळ शाखा ),मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय ( अपील शाखा ), मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निगस रोड, नवी दिल्ली-११० ००१,
उप व्यवस्थापक,भारतीय रिझर्व बँक, मुंबई.
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई, (५० प्रती)
उप संचालक, लेखा व कोषागारे, पुणे/नाशिक/नागपूर/औरंगाबाद/अमरावती/कोकण विभाग, नवी मुंबई, (प्रत्येकी ५ प्रती)
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई,
उप मुख्य लेखापरीक्षक (वरिष्ठ), स्थानिक, लेखा, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/
नाशिक/अमरावती, (प्रत्येकी १० प्रती)

सर्व जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उप कोषागार अधिकारी,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
अध्यक्ष, आय.डी.बी.आय. बँक लिमिटेड, आय.डी.बी.आय. टॉवर्स, कफ परेड, मुंबई ४०० ००५.
महा व्यवस्थापक, भारतीय स्टेट बँक, स्थानिक प्रधान कार्यालय, प्लॉट क्रमांक सी-६, जी ब्लॉक, वांद्रे-कुर्ला संकुल, मुंबई- ५१,
उप महा व्यवस्थापक, इंडियन बँक, डेव्हलपमेंट डिपार्टमेंट, २१०,मित्तल टॉवर्स, नरिमन पॉईंट, मुंबई ४०० ०२१,
महा व्यवस्थापक (प्लॅनिंग), बँक ऑफ महाराष्ट्र, प्रधान कार्यालय, "लोकमंगल",१५०१, शिवाजी नगर, पुणे-४११ ००५.
मुख्य अधिकारी (विपणन), बँक ऑफ इंडिया, ७०-८०, महात्मा गांधी रोड, मुंबई ४०० ०२३
वरीष्ठ विपणन व्यवस्थापक, पंजाब नॅशनल बँक, प्रादेशिक कार्यालय, दालामल हाऊस, ११ वा मजला, नरीमन पॉईंट, मुंबई - ४०० ०२१,
उप महा व्यवस्थापक,स्टेट बँक ऑफ हैद्राबाद, प्रादेशिक कार्यालय,टाऊन सेंटर, सिडको, औरंगाबाद-४३१ ००३
उप महाव्यवस्थापक, सेंट्रल बँक ऑफ इंडिया, केंद्रीय कार्यालय, चंदरमुखी, नरीमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१.
उप महा व्यवस्थापक (कॉर्पोरेट प्लानिंग), देना बँक, मुख्य कार्यालय, देना कॉर्पोरेट सेंटर, सी-१०, जी- ब्लॉक, वांद्रे-कुर्ला संकुल, मुंबई- ४०० ०५१,
महा व्यवस्थापक, आंध्र बँक,प्रादेशिक कार्यालय,ए.एम.एल.-२,८-महल इंडस्ट्रियल इस्टेट, महाकाली गुंफा रोड, अंधेरी (पूर्व), मुंबई -४०० ०९३,
उप महाप्रबंधक, कॉर्पोरेशन बँक, प्रादेशिक कार्यालय,मुंबई, २८ मित्तल चेंबर्स, नरिमन पॉईंट, मुंबई ४०० ०२१
उप महा व्यवस्थापक, युनियन बँक ऑफ इंडिया,प्लॅनिंग रिसर्च अँड डेव्हलपमेंट डिपार्टमेंट, केंद्रीय कार्यालय, २३९, विधान भवन मार्ग, मुंबई -४०० ०२१
अध्यक्ष, यु.टी. आय. बैंक लिमिटेड, सेंट्रल ऑफीस, मेकर टॉवर्स "एफ", १३ वा मजला, कफ परेड, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
व्यवस्थापक, आय.सी.आय.सी.आय. बँक लिमिटेड, २१५, फ्री प्रेस हाऊस, नरिमन पॉईंट, मुंबई ४०० ०२१,
उपाध्यक्ष, एच्.डी.एफ्.सी. बैंक लिमिटेड, दुसरा मजला, ट्रेड वर्ल्ड, न्यु बिल्डिंग, कमला मिल्स, सेनापती बापट मार्ग, लोअर परेल, मुंबई ४०० ०१३,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, वित्त विभाग-कोषागारे-५.

........

* <u>पत्राव्दारे.</u>